उपसंचालक, आरोग्य सेवा,नागपूर मंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखालील जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी यांची १४५ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पदआ २०२० /प्र.क्र.८४/आरोग्य-३

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
दिनांक : २० ऑगस्ट,२०२०

वाचा -

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक - पदआ २०१९/प्र.क्र.११७/आरोग्य -३, दिनांक- ११.१०.२०१९.
२) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- आआसे/कक्ष-७अ/टे-८ / वैद्यकिय अधिकारी/अस्थाई पदे/१६८०-८१/२०२०, दिनांक-१७.०८.२०२०.

**शासन निर्णय-**

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर यांच्या अधिपत्याखालील नागपूर, चंद्रपूर, वर्धा, गडचिरोली, भंडारा व गोंदिया या ६ जिल्हयामधील जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी गट-अ च्या एकूण ९० अस्थायी पदांना दि.०१.१०.२०१९ ते दि. २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. तसेच विभागाच्या दि.१७.०१.२०१३, दि.०२.०१.२०१७, दि.१६.०२.२०१८, दि.०६.०६.२०१९ व दि.१८.०६.२०१९ अन्वये नवीन पदे निर्माण करण्यात आली आहेत. त्यामुळे अश्या नवीन ५५ अस्थायी पदांना ही मुदतवाढ देणे आवश्यक आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये नागपूर, चंद्रपूर, वर्धा, गडचिरोली, भंडारा व गोंदिया या ६ जिल्हयातील जिल्हा परिषदेकडील प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी गट-अ (वेतनश्रेणी एस-२०, ५६१००-१७७५००)च्या सदर १४५ अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०२० ते दि. ३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२०-२०२१ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**<u>मागणी क्रमांक-आर-१</u>**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६ - सार्वजनिक आरोग्य
००१ - रुग्णालये व दवाखाने
००१ (चार) - गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ०३७१)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दिनांक- १२.०२.२०२० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७२७११२४१९०९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.08.20 12:57:15 +05'30'

**(रो.दि.कदम-पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये- राज्यस्तर) मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, नागपूर/चंद्रपूर/वर्धा/गडचिरोली/भंडारा/गोंदिया.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/चंद्रपूर/वर्धा/गडचिरोली/भंडारा/गोंदिया.
८. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
१०. निवडनस्ती (आरोग्य-३)